आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शिर्षांतर्गत निधी वितरण.
(लेखाशीर्ष २२०२ एच ९७३)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/कार्यासन ६**
**मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : -०६ जानेवारी,२०२२.**

**वाचा :-**

१) शासन निर्णय, वि. वि. , क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) शासन निर्णय, आ. वि. वि.,समक्रमांक, दि.१६.०९.२०२१.
३) शासन पत्र, आ.वि.वि.क्र.अआशा-२०२१/प्र.क्र.२०/का-११,दि.३१.०३.२०२१.
४) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय यांचे पत्र क्र.सैनिक शाळा-२०२१/ प्र.क्र.०४/ का.६(३)/ ६८६५, दि.१७.१२.२०२१.
५) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.अआशा-२०२१/प्र.क्र.९१/का-११.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सैनिकी शाळांमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य या योजनेंतर्गत प्रति विद्यार्थी वार्षिक रू.२००००/- इतके शैक्षणिक शुल्क व निर्वाह भत्त्याचे अनुदान संबंधित संस्थांना उपलब्ध करून देण्यात येते.

सन २०२१-२२ या वर्षात राज्यातील २० सैनिकी शाळांमध्ये एकूण ६६१५ आदिवासी विद्यार्थी प्रवेशित असून या शाळांतील इयत्ता ८ वी ते १२ वीच्या तुकड्या दि.१५.०७.२०२१ व इयत्ता ६वी ते ७ वी च्या तुकड्या दि.१७.०८.२०२१ पासून सुरू करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयान्वये कार्यक्रम खर्चांतर्गत अर्थसंकल्पित तरतूदींच्या ५० टक्के मर्यादेतील तरतूदी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत. या अनुषंगाने सन २०२१-२२ मध्ये सैनिकी शाळांमधील प्रवेशित विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्क व निर्वाह भत्त्यासाठीच्या अनुदानापोटी निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात मागणी क्र.टी-५ मधील २२०२-सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत सैनिकी शाळांमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य या योजनेच्या लेखाशीर्ष २२०२ एच ९७३,३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रू.१५००.०० लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पित आहे. सदर तरतुदींमधून सन २०२१-२२ या वर्षात सैनिकी शाळांतील प्रवेशित आदिवासी विद्यार्थ्यांचे शैक्षणिक शुल्क व निर्वाह भत्त्यासाठी **रु.६६१.५० लाख (अक्षरी रुपये सहा कोटी एकसष्ट लाख पन्नास हजार फक्त )** इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रमाणे निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला असून नियंत्रक अधिकारी यांनी सदर वितरीत तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर वितरीत निधीमधून प्रवेशित विद्यार्थ्यांना वार्षिक देय शुल्क/ निर्वाह भत्त्यापोटीच्या अनुदानाचा ५० टक्के प्रथम हप्ता अदा करण्यात यावा. पुढील हप्ता अदा करतांना प्रत्यक्ष उपस्थिती कालावधी विचारात घेऊन ताळमेळ घेण्यात यावा. उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास पाठवावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०६१०५६५११२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.01.06 13:03:17 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. कक्ष अधिकारी (का-११), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.